**नगर रचनाकार, विकास योजना विशेष घटक, वाशिम हे कार्यालय नगर रचनाकार, विकास योजना विशेष घटक, जळगाव महानगरपालिका येथे पदांसहीत स्थानांतरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विघयो-३८२२/१४७३/प्र.क्र.२२७/नवि-२७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला मुख्य इमारत, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १६ फेब्रुवारी, २०२३

वाचा :- १. आयुक्त, जळगाव महानगरपालिका, जळगाव यांचे पत्र क्र.नर/९६०/२०२२, दि.२४.०८.२०२२.
२. संचालक, नगर रचना आणि मूल्यनिर्धारण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.अर्थसंकल्प/जळगाव-वियो.विघ/५४१३, दि.०१.११.२०२२.

प्रस्तावना :-

संचालक, नगर रचना आणि मूल्यनिर्धारण विभाग, पुणे यांनी उपरोक्त वाचा येथील अ.क्र.२ येथील दि.०१.११.२०२२ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, नगर रचनाकार, विकास योजना विशेष घटक, वाशिम कार्यालयाचे कामकाज संपूष्टात आले असून, नगर रचनाकार, विकास योजना विशेष घटक, वाशिम कार्यालय स्थलांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.

शासन निर्णय :-

जळगाव शहर महानगरपालिकेच्या क्षेत्राची (मुळ हद्द + वाढीव हद्द) सुधारित विकास योजना तयार करण्याकरीता तसेच, विकास योजना विशेष घटक, वाशिम कार्यालयाचे कामकाज संपूष्टात आले असल्यामुळे, खालीलप्रमाणे नामाभिदानाने स्थलांतरीत करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.:-

| अ.क्र. | सध्याच्या विकास योजना विशेष घटक कार्यालयाचे नांव | सुधारित करावयाच्या विकास योजनेसाठी घटक कार्यालयाचे नांव | सुधारित करावयाच्या विकास योजनेसाठी घटक कार्यालयाचे मुख्यालय | सुधारित करावयाच्या मंजूर विकास योजना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | नगर रचनाकार, विकास योजना विशेष घटक, वाशिम. | नगर रचनाकार, विकास योजना विशेष घटक, जळगाव महानगरपालिका. | जळगाव | जळगाव शहर महानगरपालिकेच्या क्षेत्राची (मुळ हद्द + वाढीव हद्द) सुधारित विकास योजना तयार करण्याकरीता. |

०२. जळगाव शहर महानगरपालिकेच्या क्षेत्राची (मुळ हद्द + वाढीव हद्द) सुधारित विकास योजना तयार करण्याकरीता सध्या अस्तित्वात असलेल्या नगर रचनाकार, विकास योजना विशेष घटक, वाशिम

कार्यालयातील खालीलप्रमाणे नमूद पदे आदेशाच्या दिनांकापासून नगर रचनाकार, विकास योजना विशेष घटक, जळगाव महानगरपालिका कार्यालयांकडे वर्ग करण्यास शासनाची याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

| पदनाम | मंजूर पदे | वेतन स्तर | वेतन संरचना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| नगर रचनाकार | १ | एस-२० | रु.५६१००-१७७५०० |
| सहायक नगर रचनाकार | १ | एस-१५ | रु.४१८००-१३२३०० |
| रचना सहायक | २ | एस-१४ | रु.३८६००-१२२८०० |
| कनिष्ठ आरेखक | १ | एस-०८ | रु.२५५००-८११०० |
| | | ५ वर्षाचे अर्हताकारी सेवेनंतर | |
| | | एस-१३ | रु.३५४००-११२४०० |
| अनुरेखक | २ | एस-७ | रु.२१७००-६९१०० |
| | | ७ वर्षाचे अर्हताकारी सेवेनंतर | |
| | | एस-८ | रु.२५५००-८११०० |
| **एकूण पदे** | **७** | | |

०३. शासनाच्या दि.३०.०८.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये संचालक, नगर रचना आणि मूल्यनिर्धारण विभाग, पुणे या कार्यालयातील आस्थापना पदांना दि.२८.०२.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. विकास योजना विशेष घटक, वाशिम कार्यालयाची पदे विकास योजना विशेष घटक, जळगाव महानगरपालिका या कार्यालयाकडे वर्ग करण्यात आल्यानंतर सदर अस्थायी पदांची मुदतवाढ दि.२८.०२.२०२३ पर्यंत चालू राहील. तसेच, प्रस्तुत पदांचे अनुज्ञेय वेतन व भत्ते तसेच, आस्थापना खर्च (कार्यालयीन वाहन, दुरध्वनी, संगणक, स्टेशनरी, फर्निचर इत्यादी) जळगाव महानगरपालिकेमार्फत वहन करण्यात येईल.

०४. नगर रचनाकार, विकास योजना विशेष घटक, जळगाव महानगरपालिका कार्यालयाचे नगर रचनाकार यांना सदर कार्यालयाचे **"कार्यालय प्रमुख"** म्हणून घोषित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०२३०२१६१३३६२१२७२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, pseudonym=313EF6135E0B8753370AABCB2544201CB95641CD, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=Vijay Karbhari Chaudhari
Date: 2023.02.17 11:35:14 +05'30'

**( विजय चौधरी )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल महोदयांचे प्रधान सचिव.
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव.

३. मा.उप मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.
४. अपर मुख्य सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
८. सर्व विभागीय आयुक्त.
९. जिल्हाधिकारी, वाशिम / जळगाव.
१०. संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे (पाच प्रतीसह)
११. आयुक्त, जळगाव महानगरपालिका, जळगाव.
१२. सह सचिव तथा संचालक नगर रचना, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. सर्व विभागीय सह संचालक, नगर रचना.
१४. उप सचिव, नवि-२५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. जिल्हा कोषागार अधिकारी, जळगाव.
१६. नगर रचनाकार, विकास योजना विशेष घटक, वाशिम.
१७. नगर रचनाकार, विकास योजना विशेष घटक, जळगाव महानगरपालिका, जळगाव.
१८. निवडनस्ती/नवि-२७.